# महाराष्ट्र शासन
# गृह विभाग

**शासन ज्ञापन क्रमांक दुरूस्ती-१०१८/प्र.क्र.३८८/पोल-७.**

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.

दिनांक ०३ जानेवारी २०१९.

**विषय** :- पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या अधिपत्याखालील पोलीस ठाणे, माहीम, अंतर्गत सेवा निवासस्थानांच्या दुरूस्तीची विवक्षित कामे करण्यासाठी प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत.

**संदर्भ** :-

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१४/ प्र.क्र.४९/ १४/ विनियम, दिनांक ०५.०१.२०१५.

२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/ १३/ विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५.

३) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. पोआ/ कक्ष-८(४)/शा.२४३/२०१८, दिनांक २९.०९.२०१८.

**ज्ञापन.-**

पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांनी पोलीस ठाणे, माहीम, अंतर्गत सेवा निवासस्थानांच्या दुरूस्तीची पुढील कामे करण्यासाठी प्रशासकीय मान्यता मिळणेबाबतचा प्रस्ताव सादर केला आहे:-

| अ.क्र. (१) | कामाचे नाव (२) | खर्चाचे अंदाज (३) |
|---|---|---|
| १. | *"Structural repairs and strengthening to 10 P.S.I. Quarters at Mahim Police Station campus, Mahim--repairs to external/ internal plaster and painting, flooring, doors and windows, water supply and sanitary pipe line."* | रु.४६,५४,६४६/- |
| २. | *"Structural repairs and strengthening to Kadri Chawl at Mahim Police station campus, Mahim--repairs to external/ internal plaster and painting, flooring, doors and windows, water supply and sanitary pipe line."* | रु.९१,१८,६६४/- |
| ३. | *"Structural repairs and strengthening to R.C.C. Chawl "A" Block at Mahim Police Station compound, Mahim--repairs to external/ internal plaster and painting, flooring, doors and windows, water supply and sanitary pipe line."* | रु.१,०८,७८,२९२/- |
| ४. | *"Structural repairs and strengthening to R.C.C. Chawl "B" Block at Mahim Police station campus, Mahim--repairs to external/ internal plaster and painting, flooring, doors and windows, water supply and sanitary pipe line."* | रु.१,०८,७८,२९२/- |
| **एकूण-** | | **रु.३,५५,२९,८९४/-** |

२. उक्त कामासाठी उप अभियंता, उत्तर (सा.बां.) उपविभाग, दादर मुंबई, यांनी सन २०१७-१८ च्या राज्य दरसूचीनुसार तयार केलेले एकूण **रु.३,५५,२९,८९४/-** इतक्या खर्चाचे अंदाज सादर केले असून ते कार्यकारी अभियंता, मध्य मुंबई (सा.बां.) विभाग, मुंबई, व अधीक्षक अभियंता, मुंबई (सा.बां.) मंडल, यांनी साक्षांकित केले आहेत.

३. उक्त खर्चाचे अंदाज हे सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, यांनी तपासले आहेत आणि त्याप्रमाणे, विवक्षित अटींवर, प्रशासकीय मान्यता देण्यास सहमती दिली आहे.

४. त्या अनुसार, पोलीस ठाणे, माहीम, अंतर्गत सेवा निवासस्थानांच्या दुरूस्तीची, परिच्छेद १ मधील तक्त्यातील स्तंभ (२) मध्ये नमूद केलेली कामे करण्यासाठी स्तंभ (३) मध्ये निर्दिष्ट केल्याप्रमाणे एकूण **रु.३,५५,२९,८९४/-** *(रुपये तीन कोटी, पंचावन्न लक्ष, एकोणतीस हजार, आठशे चौऱ्याण्णव रुपये फक्त)* इतक्या खर्चाच्या अंदाजास, पुढील अटीवर, याद्वारे, प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

१) निधी उपलब्ध झाल्याशिवाय काम सुरू करू नये.
२) खर्चाचे अंदाज हे पोलीस सह आयुक्त (प्रशासन), बृहन्मुंबई, यांनी साक्षांकित करणे आवश्यक आहे.

५. उक्त कामासाठी येणारा खर्च हा गृह विभाग--मागणी क्र. बी-१, २०५५, पोलीस, ००, १०८, राज्य मुख्यालय पोलीस, (०२) शहर पोलीस, (०२)(०१) शहर पोलीस-आस्थापना (दत्तमत)(अनिवार्य) (२०५५ ००९७), २७, लहान बांधकामे, याखाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

६. हे ज्ञापन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.५९०/१८/इमा.-२, दिनांक १९.१२.२०१८, अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

७. हे ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या *www.maharashtra.gov.in* या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०१०८११३०३१५३२९ असा आहे. हे ज्ञापन डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SWAPNIL GOPAL BORSE

Digitally signed by SWAPNIL GOPAL BORSE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=c6a6e7cad855fc787a96e36f11fbc87a9f66cfd9bad01184493f2735ad885627, postalCode=400032, street=2ND FLOOR,MANTRALAYA,MADAME CAMA MARG,MUMBAI, serialNumber=8538cd1e408948f7d025537d5f6589bd8958d1b95322e66d2cc5edf89ad0d79e, ou=HOME DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SWAPNIL GOPAL BORSE
Date: 2019.01.08 11:41:23 +05'30'

**(स्वप्नील गोपाल बोरसे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**
पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.

**प्रत-**

१) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडल, मुंबई.
२) कार्यकारी अभियंता, मध्य मुंबई (सा.बां.) विभाग, मुंबई.

३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
५) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
६) कार्यासन अधिकारी (इमा-२), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) कार्यासन अधिकारी (व्यय-७/ विनियम), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) निवड फाईल (पोल-७).